महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ (क) (तां) संवर्गातील अधिकाऱ्यांची सन २०२१ मध्ये प्रशासकीय कारणास्तव करण्यात आलेल्या बदलीमध्ये अंशत: बदल करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग**
**शासन आदेश क्रमांक : व्यशिअ-२०२०/(१२५/२०)/व्यशि-१**
२ रा माळा, मुख्य इमारत, मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक: १३ ऑक्टोबर, २०२१

संदर्भ:- १) कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, शासन आदेश क्र:व्यशिअ-२०२०/(१२५/२०)/व्यशि-१, दि. ३०/०८/२०२१

२) मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांचे मूळ अर्ज क्र. ७०६/२०२१ मधील दि. १६.०९.२०२१ रोजीचे आदेश.

## शासन आदेश

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ (क) (तां) एस-२०:५६१००-१७७५०० या वेतनश्रेणीतील प्राचार्य/उपप्राचार्य, औ. प्र. संस्था, मुख्याध्यापक, शा. तां. मा. वि. निरीक्षक, सहायक प्रशिक्षणार्थी सल्लागार (तां) (व) या संवर्गातील श्री. एस. डी. नलावडे, मुख्याध्यापक, शासकीय तंत्र माध्यमिक शाळा, नाशिक यांची प्रशासकीय कारणास्तव बदली प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, अलापल्ली, जि.गडचिरोली या पदावर संदर्भ क्र. १ येथील आदेशान्वये करण्यात आली आहे. सदर आदेशाविरुध्द श्री. नलावडे यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे मूळ अर्ज क्र. ७०६/२०२१ दाखल केला आहे. सदर मूळ अर्जाच्या अनुषंगाने मा. न्यायाधिकरणाने संदर्भ क्र. २ येथील दि. १६.०६.२०२१ रोजी दिलेल्या आदेशानुसार महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने श्री. नलावडे यांच्या बदलीनंतरच्या पदस्थापनेत अंशत: बदल करण्यात येत असून त्यांची सुधारित पदस्थापना **प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, महाड, जि. रायगड** येथे करण्यात येत आहे.

२. उपरोक्त बदली झालेल्या अधिका-याने सदर बदली आदेश प्राप्त होताच बदलीने दर्शविलेल्या ठिकाणी हजर व्हावे व संबंधीत कार्यालय प्रमुखांनी त्यांना तात्काळ कार्यमुक्त करावे. संबंधित अधिका-याने बदलीच्या पदावर हजर झाल्यानंतर तात्काळ कार्यभार हस्तांतरण प्रमाणपत्रासह त्यांचा रुजू अहवाल संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्यामार्फत विहित मार्गाने शासनास न चुकता विनाविलंब शासनास सादर करावा.

३. वरीलप्रमाणे पदस्थापना करण्यात आलेल्या अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करु नये वा महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने पदस्थापना झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत.

४. सदर पदस्थापना करण्यात येत असलेल्या अधिकाऱ्याला पदस्थापनाने देण्यात आलेल्या पदावर रुजू करून घेताना, ते रजेवर/गैरहजर होते किंवा कसे याबाबतची खातरजमा करुन त्यांना पदस्थापनेवर हजर करुन घेणाऱ्या कार्यालयाने करावी. सदर अधिकारी वैद्यकीय कारणास्त्व गैरहजर पदस्थापनेवर

हजर करुन घेण्यापूर्वी वैद्यकीय मंडळासमोर पाठवावे.जर अन्य रजेवर आढळल्यास त्यांचेकडून न चुकता तसा रजेचा अर्ज भरुन घ्यावा आणि नंतर हजर करुन घ्यावे. तसेच रजा संदर्भात शासनाने वेळोवेळी प्रस्तुत केलेल्या शासन निर्णय/ परिपत्रकांतील निर्देशांचे पालन करावे.

५. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमानुसार दिलेल्या पदग्रहण अवधीतच बदली झालेल्या अधिकाऱ्याने बदलीच्या ठिकाणी रुजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या पदग्रहण अवधीत बदलीच्या ठिकाणी रुजू न झाल्यास, त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यादिन (dies non) म्हणून गणला जाईल.

६. बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी उपरोक्त अधिका-याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास, तसेच बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून संबंधित अधिका-यांविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२११०१३१४५८२८८५०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vinod Sheshrao Bondre

Digitally signed by Vinod Sheshrao Bondre
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Skill Development and Entrepreneurship Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=4bd97b779f6f1e9e61491311a06aac663b01b00963f2e754c6ee2d5f7c14953d,
serialNumber=c313a8b86d67716d182c41d1e22f57d99c8ee5f4654a216d8fe23b5ad24ed271, cn=Vinod Sheshrao Bondre
Date: 2021.10.13 15:03:46 +05'30'

**( विनोद शे. बोंदरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री, (कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) मा. राज्यमंत्री (कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३) संचालक,व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय,म.रा., मुंबई-१.
४) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास परीक्षा मंडळ, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
५) सह संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय (सर्व संबंधितांना संचालकांमार्फत)
६) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
७) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व संबंधितांना संचालकांमार्फत)
९) संबंधित अधिकारी (संचालकांमार्फत)
१०) सर्व संबंधित कार्यालय/संस्था (संचालकांमार्फत)
११) निवडनस्ती (व्यशि-१).